१०० टक्के केंद्र पुरस्कृत औषधी व सुगंधी वनस्पतीच्या विकासाची योजना सन २००१-२००२ मध्ये राज्यात राबविण्यासाठी प्रशासकीय मंजूरी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्र. औसुयो ११०१/प्र.क्र. ७७/फ-३
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ११ मे, २००१.

वाचा :- १) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र.औसुयो ११००/२५९४८/ प्रक्र ९६/फ-३, दि. १० फेब्रुवारी २००१.
२) शासन निर्णय कृषी व पदुम विभाग क्रमांक औसुयो ११००/२५९४८/प्रक्र ९६/फ -३, दिनांक ३१ मार्च २००१.
३)केंद्र शासन कृषि मंत्रालय नवी दिल्ली याचे पत्र क्र. १२-२/२-के पॉलिसी /एम्.एम्-२ दि. ३ एप्रिल , २००१
४) संचालक फलोत्पादन कृषी आयूक्तालय यांचे पत्र क्रं एचडीएस / फलो - ३/ ०१३/ औ.व.स.ुयो /१७८६/०१ दिनांक ३ मे २००१.
शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. अंदाज-१००१/प्र.क्र.८१/२५-अे, दि. १०.५.२००१

प्रस्तावना:-

औषधी व सुगंधी वनस्पतीची शास्त्रोक्त पद्धतीने लागवड करुन यावर आधारित उद्योगधंद्यांना कच्च्या माल उपलब्ध करुन देणे या मुख्य उद्देशाने ही केंद्र पुरस्कृत योजना सन १९९४-९५पासून राज्यात राबविण्यात येत आहे.औषधी व सुगंधीयुक्त वनस्पतीची लागवड हे शेतक-यांना उत्पन्न वाढविण्याचे एक दालन उपलब्ध करुन देत आहे. या परिस्थितीत केंद्र शासनाने या योजनेमध्ये चांगल्या दर्जाची कलमे/ रोपे पुरविणे/ हर्बल गार्डन स्थापन करणे , रोपवाटिका उभारणे , प्रात्यक्षिके आयोजित करणे.व नवीन तंत्रज्ञान शेतक-यापर्यंत पोहोचविणे, इत्यादि घटकांचा समावेश केला आहे. हे घटक प्रामुख्याने कृषी विद्यापीठामार्फत राबविले जातात. त्याकरिता केंद्र शासन संबंधीत विद्यापीठांना परस्पर अनुदान देते . यापैकी प्रात्यक्षिके बीजोत्पादन क्षेत्राची स्थापना व क्षेत्र विस्तार हे घटक कृषी खात्यामार्फत राबविले जातात.सध्या फलोत्पादन विकासाच्या दृष्टीकोनातून केंद्र शासनाने औषधी व सुगंधी वनस्पतीच्या विकासाच्या योजना राबविण्याचा निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :-

औषधी व सुगंधी वनस्पतीच्या विकासाची योजना ही १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना म्हणून राज्यात सन २०००- २००१ या वर्षात राबविण्यासाठी मान्यता देण्यात आली होती. औषधी व सुगंधी वनस्पतीच्या विकासाची योजना ही १००% योजना म्हणून राज्यात सन २००१-२००२ मध्ये रुपये ६५ .०० लाख ( अक्षरी रुपये पासष्ठ लाख फक्त) इतकया अनुदानाच्या

GR - 200201211708442000-0400

कार्यक्रमास शासनाची प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. सदर योजनेच्या कार्यक्रमाचा घटक निहाय तपशील खालीलप्रमाणे आहे.

केंद्र पुरस्कृत औषधी व सुगंधी वनस्पतीच्या विकासाची योजना सन २००१-२००२

| अ.क्रं | बाब व मापदंड | सन २००१ ते २००२ प्रस्तावित कार्यक्रम (रुपये लाखात) | |
|---|---|---|---|
| | | भौतिक | आर्थिक |
| १ | प्रात्यक्षिक तथा बिजोत्पादन क्षेत्राची स्थापना ( ०.१०हेक्टर | ५०० | १५ |
| २ | क्षेत्रविस्तार ( हेक्टर) | ८८ | ११ |
| ३ | औषधी व सुगंधी वनस्पतीच्या बगीच्याची स्थापना करणे. ( ३ हेक्टर) | ८ | ८ |
| ४ | औषधी व सुगंधी वनस्पतीच्या बगीच्यास संलग्न रोपवाटिकेचे स्थापना करणे ( १ हेक्टर) | ४ | ८ |
| ५ | विश्लेषण प्रयोगशाळेची स्थापना करणे. | २ | ४ |
| ६ | औषधी व सुगंधी वनस्पतीच्या विकासाकरीता तंत्रविस्तार कार्य ( शेतकरी सहल) | ५०० | ५ |
| ७ | सुगंधी वनस्पतीपासून सुगंधी द्रव्य विलग करण्याकरिता उर्ध्वपातन केंद्राची स्थापना | ४ | ३ |
| ८ | मनुष्यबळ विकास कार्यक्रम | - | ५ |
| ९ | माहिती प्रसार सोयी सुविधा आकस्मिक खर्च प्रवासभत्ता व पीओएल. | - | ६ |
| | एकूण | | ६५ |

२.. या योजनेवरील खर्च हा खालील लेखाशिर्षांतर्गत खर्ची दाखवून त्याअंतर्गत सन २००१-२००२ योजना राबविण्याकरिता मंजूर असलेल्या अर्थसंकल्पीय अनुदानातून करण्यात यावा.

मागणी क्रमांक - डी - ३
२४०१ पिक संवर्धन
११९ - बागायती व भाजीपाला पिके
११९ (दोन) (बी) (चौदा ) औषधी व सुगंधी वनस्पती ( के.पु.यो.)
४३ - अर्थसहाय्य (२४०१ ४१०४)

३. या योजनेचा खर्च करण्यास आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणन घोषित करण्यात येत आहे. तसेच आयुक्त कृषी , महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी योजना अंमलबजावणीसंबंधी मार्गदर्शक सूचना संबंधिताना दयाव्यात.

hort 3 g r59/70/99

GR- 20020121170842000 - 0400

४. हे आदेश मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त केलेल्या राज्य स्तरीय सल्लगार / अंमलबजावणी समितीच्या दिनांक ८ मे २००१ च्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५२५/ व्यय-१, दिनांक ११.५.२००१ व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. ३९७/अर्थोपाय, दिनांक ११.५.२००१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(फ.ब. खान)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन,
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग.

प्रति,

आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.(१० प्रती)
सर्व विभागीय कृषी सहसंचालक
सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी
वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी पुणे.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा), महाराष्ट्र , १, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र , २, नागपूर.
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (२५ प्रती)
सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नविन प्रशासकिय भवन, ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई - ३२.
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
वित्त विभाग,व्यय-१, अर्थसंकल्प -३, अर्थसंकल्प -१२, मंत्रालय, मुंबई-३२.
कार्यासन अधिकारी, २५-ओ, फ-२, कृषि व पदुम विभाग.
निवड नस्ती.फ-३

GR- 200201211708420000-0400